१३ निर्लेखित वाहनांच्या बदली १३ नवीन वाहने खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**गृह (परिवहन) विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-१२१९/प्र.क्र.२७४/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : १२ जून, २०२३

**वाचा :**

१) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे क्र.कावाआ/०१०९/नस्ती क्र.१/ का-१० / जा.क्र.१२२९१,दि.१३ सप्टेंबर,२०१९

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वाहन २०१७/प्र.क्र.४१/१७/विनियम, दि.२८.०७.२०२०

३) पआका/१२५५०/का-१०/जा.क्र.निरंक दि. ११ ऑक्टोबर, २०२१ रोजीचे पत्र.

४) कावाका/०१०९/नस्ती नं.१/पआका/का-१०/जा.क्र.२२२२, दि.२१ फेब्रुवारी,२०२२.

५) पआका/का.१०/वाहनखरेदी २०२२/जा.क्र.११९०४, दि.२ नोव्हेंबर,२०२२ व जा.क्र.५८९५, दि.१९ मे,२०२३ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :**

परिवहन आयुक्त कार्यालयाने उपरोक्त उपनिर्दिष्ट क्र. १, ३, ४ ते ५ येथील पत्रान्वये निर्लेखित केलेल्या वाहनांच्या बदली नवीन वाहन खरेदीस मंजूरी देण्यासाठीचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

गृह (परिवहन) विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रीय कार्यालयातील १३ निर्लेखित वाहनांच्या बदली १३ नवीन वाहने ( ९ कार + ४ जीप ) प्रत्येकी रु.८.०० लाख प्रतिवाहन याप्रमाणे येणारा एकूण खर्च रु.१,०४,००,०००/- (रुपये एक कोटी चार लाख फक्त ) इतक्या रकमेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी :-**

१. निधी उपलब्धतेनुसार, शासन निर्णय वित्त विभाग क्र. वाहन - २०१७/प्र.क्र. ४१/१७/विनियम, दिनांक २८ जुलै, २०२० मधील तरतूदींनुसार परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना रु.८.०० लाख या मर्यादेत (वाहनांची किंमत + वस्तू व सेवा कर + टेम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस + सहाय्यभूत साहित्य Accessories इत्यादी अंतर्भूत करुन ) वाहने खरेदी करण्यात यावीत.
२. शासन निर्णय, उद्योग उर्जा व कामगार विभाग, क्र. भाखस - २०१४/प्र.क्र. ८२/भाग- उद्योग-४ दि.०१ डिसेंबर, २०१६ व क्र.संकिर्ण-२०१६ /प्र.क्र.२१५/उद्योग-४,दि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयानुसार वाहन खरेदी GeM Portal वरुन विहित पध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावी.

३. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई कार्यालयातील वायुवेग पथकाकरीता खरेदी केलेल्या ७६ इंटरसेप्टर वाहनांच्या कार्योत्तर मान्यतेचा प्रस्ताव, तसेच सदर वाहने वाहन आढाव्यात समाविष्ट करुन घेण्याबाबतचा सुधारीत वाहन आढाव्याचा प्रस्ताव, पुर्ततेसह राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेस्तव सादर करावा.

४. राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या दि.२१ एप्रिल,२०१८ रोजीच्या बैठकीत परिवहन विभागाच्या वायुवेग पथकाकरीता मंजूर करण्यात आलेले २५ जीप खरेदी करण्यात आलेली नाहीत यास अधीन राहून सदर मान्यता देण्यात येत आहे.

५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.वाहन-२०१३/प्र.क्र.४६/१३/विनियम, दिनांक ०३ ऑक्टोबर, २०१७ मधील तरतूदीनुसार वाहन आढाव्या अन्वये, परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई व त्यांच्या अधिनस्त कार्यालयाकरीता अनुज्ञेय ठरविण्यात आलेल्या सर्व नवीन १३ वाहनांची माहिती महावाहन संगणक प्रणालीवर नोंद घेणे व नवीन वाहन खरेदीनंतर जुन्या वाहनांची नोंद महावाहन प्रणालीवरुन नष्ट करुन नवीन वाहनांची नोंदणी त्या ठिकाणी करणे, याची जबाबदारी परिवहन आयुक्त यांची राहील.

२. यासाठी येणारा खर्च "मागणी क्र.बी-३, मुख्य लेखाशीर्ष २०४१, वाहनांवरील कर (००)(००१ ) संचालन व प्रशासन (०१) परिवहन आयुक्त (दत्तमत) (अनिवार्य) (२०४१ ००१८) - ५१ मोटार वाहने" या लेखाशिर्षांतर्गत सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.४८/२०२३/विनियम, दि.१३/०२/२०२३ आणि राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१२१६०११९२७२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LANGHI BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2023.06.12 16:03:23 +05'30'

( भरत लांघी )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव

२. मा.मुख्यमंत्री (परिवहन) यांचे अपर मुख्य सचिव

३. महालेखापाल (लेखापरीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर

४. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई

५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

६. निवासी लेखा अधिकारी, मुंबई

७. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई

८. निवड नस्ती (परिवहन-४).